**शासकीय कार्यालये / महामंडळे / प्राधिकरणे / स्थानिक संस्था यांनी वास्तुविशारदांची नियुक्ती करतांना वास्तुकला परिषदेच्या (Council of Architecture) मार्गदर्शक सूचना व अटींची अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : टिपीएस- १८१७/प्र.क्र.१७४/१७/नवि-१३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ सप्टेंबर, २०१८

**शासन परिपत्रक-**

वास्तु कला परिषद (Council of Architecture) नवी दिल्ली यांनी दि. ०३.०२.२०१६ च्या पत्रान्वये वास्तुविशारद अधिनियम, १९७२ (Architect Act, १९७२) ची योग्य ती अंमलबजावणी करण्याची विनंती केलेली आहे. तसेच वास्तु कला परिषदेने विहित केल्यानुसार वास्तुविशारदांची नियुक्ती करणे, त्यांची निवड वाणिज्यिक निविदा प्रक्रियेद्वारे न करता वास्तुविशारद अधिनियमातील वास्तुकला संकल्पना स्पर्धेद्वारे निवडणे, वास्तुविशारदांना फी, अनामत रक्कम भरणे, कार्यक्षमता हमी, निविदा सुरक्षा रक्कम इ. मधून सूट देण्याची विनंती वास्तुविशारदांकडून शासनास प्राप्त झाली आहे.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर शासकीय कार्यालये / महामंडळे / प्राधिकरणे / स्थानिक संस्था यांना वास्तुविशारदांची नेमणूक करीत असताना वास्तुविशारद अधिनियमातील तरतुदीनुसार पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

अ) राज्य शासनाच्या कोणत्याही शासकीय कार्यालये / महामंडळे / प्राधिकरणे / स्थानिक संस्था यांनी वास्तुविशारदांची नेमणूक करीत असतांना वास्तुविशारद अधिनियम, १९७२ आणि त्या अंतर्गत तयार केलेले नियम, विनियमांची अंमलबजावणी योग्यरितीने करण्यात यावी तसेच वास्तु कला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांनी या अनुषंगाने विहित केलेल्या सर्व मार्गदर्शक सूचना आणि अटींचे पालन करण्यात यावे.

ब) सदर सूचना सर्व प्रशासकीय विभागांनी आपल्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व कार्यालयांना / संस्थांच्या निदर्शनास आणाव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१८०९१११६१८१३५५२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Pawar Rajendra Mahadeo

Digitally signed by Pawar Rajendra Mahadeo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=067430cc40fa025778474fe517135308998291569d7c9bfff7bbf28e6c0e2a7e, serialNumber=8e00f0107ae5850fe7df8c01794ce74c5897764294f4c395d1ffc89d935c9fb3, cn=Pawar Rajendra Mahadeo
Date: 2018.09.11 16:52:08 +05'30'

**( रा. म. पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४. सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
५. मंत्रालयाचे सर्व प्रशासकीय विभाग.

६. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
९. महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. सर्व जिल्हाधिकारी.
१४. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१५. महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व सांविधानिक व सार्वजनिक उपक्रम.
१६. निवड नस्ती.